एकात्मिक रोग सर्वेक्षण प्रकल्पासाठी सन २०१४-१५ करीता जनजाती क्षेत्र उपयोजना यासाठी राज्य हिश्श्याचा रु.९.४५ लक्ष निधी वितरीत करणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एरोस २०१५/निधी वितरण/प्र.क्र.१५६/आरोग्य-५**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
संकुल इमारत, १० वा मजला, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
तारीख : १७ ऑगस्ट , २०१५

वाचा -

**१) आयुक्त, कुटुंब कल्याण तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्र.राआसोम/एफएमजी/राहि/३९९९-४००५/२०१५-१६, दिनांक १६/४/२०१५**
**२) केंद्र शासन, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. No. T-१८०१५/४/१४/२०१४-IDSP, दि.०४ जुलै, २०१४, दि.२६/१२/२०१४ व दि.२७/२/२०१५ चे पत्र.**

प्रस्तावना -

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत केंद्र पुरस्कृत एकात्मिक रोग सर्वेक्षण कार्यक्रम राज्यात राबविण्यात येत होता. राज्यात सद्या अस्तित्वात असलेल्या सर्व रोग सर्वेक्षण व्यवस्थांचे एकित्रकरण करणे, अत्याधुनिक माहिती तंत्रज्ञानाचा वापर करुन सर्व स्तरावरील माहितीची देवाणघेवाण अधिक गतिमान करणे, स्थानिक स्तरापासून राज्य स्तरापर्यंत रोग सर्वेक्षण व्यवस्थेचे बळकटीकरण करणे, तसेच रोग नियंत्रणाच्या उद्दिष्टास हातभार लावणे हा या प्रकल्पाचा प्रमुख उद्देश आहे. एकात्मिक रोग सर्वेक्षण प्रकल्पाचे मुख्यालय सहसंचालक, आरोग्य सेवा, पुणे-१ येथे आहे.

**प्रकल्पाची उध्दिष्टे :-**

१) शहरी व ग्रामीण भागात रोग सर्वेक्षण व्यवस्था अधिक बळकट करुन साथरोग उद्रेक वेळेत ओळखण्याची क्षमता विकसित करणे आणि क्षेत्रिय पातळीवर साथरोग उद्रेक प्रतिबंध व नियंत्रणासाठी आवश्यक कृतीयोजना अंमलात आणणे.
२) रोग निदानाची गुणवत्ता सुधारण्यासाठी प्रयोगशाळांचे सक्षमीकरण करणे तसेच अन्न व पाणी यांच्या गुणवत्तेचे नियमित संनियंत्रण करणे.
३) प्रकल्पांतर्गत समाविष्ट रोगांची तपासणी व उपचार यात सुधारणा करणे.
४) शहरी रोग सर्वेक्षण बळकटीकरण करणे
५) खाजगी वैद्यकीय व्यावसायिक, वैद्यकीय महाविद्यालये, अशासकीय संस्था तसेच जनतेच्या रोग सर्वेक्षणातील सहभागास चालना देणे.

६) रोग सर्वेक्षण विषयक माहितीचे दळणवळण अधिक गतिमान व सुलभतेने होण्यासाठी गावपातळी पासून राज्य पातळीपर्यंतच्या सर्व स्तरावर अत्याधुनिक माहिती तंत्रज्ञानाचा वापर करणे.

७) आरोग्य माहिती व जीवन विषयक आकडेवारी विषयी बळकटीकरण करुन रोग सर्वेक्षण मासिक प्रगती अहवालात ठळक सुधारणा घडवून आणणे

८) रोग सर्वेक्षण कार्यक्रमाशी निगडीत सर्व विभागांशी समन्वय साधणे.

सदर कार्यक्रमाला सन २०१३-१४ पर्यंत केंद्र शासनाकडून प्राप्त होणारा निधी परस्पर अंमलबजावणी अधिका-यांना प्राप्त होत होता. सन २०१४-१५ पासून केंद्र शासनाने निधीच्या वितरणाबाबत धोरणात्मक बदल केला असून आता केंद्र शासनाचा निधी यापुढे राज्य शासनाच्या कोषागारात जमा होणार असून सदर निधी अर्थसंकल्पित केल्यानंतर त्याचे वाटप संबंधित कार्यक्रम अंमलबजावणी अधिका-यांना करण्यात येणार आहे. सन २०१४-१५ पासून केंद्र शासनाच्या राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत एकात्मिक रोग सर्वेक्षण प्रकल्पाचा समावेश करण्यात आला असून कार्यक्रमाच्या अंमलबजावणीकरीता केंद्र शासन आणि राज्य शासन यांचे निधीचे प्रमाण ७५:२५ असे राहणार आहे. एकात्मिक रोग सर्वेक्षण प्रकल्पाच्या अंमलबजावणीकरीता जनजाती क्षेत्राकरीता सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात केंद्र शासनाने केंद्र हिश्श्याचा रु.२८.३४ लक्ष एवढा निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा केलेला आहे. त्याच्या प्रमाणात राज्य हिश्श्याचा २५% प्रमाणे रु.९.४५ लक्ष इतका निधी सन २०१५-१६ मधील अर्थसंकल्पीय तरतुदीतून वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

एकात्मिक रोग सर्वेक्षण प्रकल्पाच्या राज्य व जिल्हा स्तरावरील करार तत्वावरील कर्मचाऱ्यांचे वेतन देणे, प्रत्येक जिल्ह्याला कार्यालयाकरिता किरकोळ व प्रवास खर्च, प्रत्येक वैद्यकीय महाविद्यालयाकरिता प्रयोगशाळा साहित्य खरेदी, कार्यालयीन किरकोळ खर्च इत्यादी बाबींवरील खर्च भागविण्यासाठी सन २०१५-१६ या वित्तिय वर्षात सदर कार्यक्रमाकरीता जनजाती क्षेत्र उपयोजनाकरीता राज्य हिश्श्याचा २५% अर्थसंकल्पित केलेल्या रु.५६.०१ लक्ष इतक्या तरतूदीपैकी राज्य हिश्श्यापोटी सन २०१४-१५ या वित्तीय वर्षाकरीता देय असलेला रु.९.४५ लक्ष (रुपये नऊ लक्ष पंचेचाळीस हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च खालील दर्शविलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ या वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्र.टी- ५, आदिवासी विभाग
२२१०, वैद्यकीय शिक्षण व सार्वजनिक आरोग्य,
०१, नागरी आरोग्य सेवा-विषमचिकित्सा ,
७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना,
(०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांर्गत योजना
(०१) (३२) एकात्मिक रोग सर्वेक्षण कार्यक्रम, (राज्य हिस्सा २५%)
(२२१० एफ़ ८९२)

३१ सहाय्यक अनुदाने

३. सदर अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रकमेचे देयक त्यांनी कोषागारात सादर करुन विहित केलेल्या बाबीवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम संबंधीत कार्यक्रम अधिका-याकडे सुपूर्द करावी. यासाठी सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. २०१३/प्र.क्र.८५/२०१३/अर्थसंकल्प-३ , दि. २५/४/२०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभाग व वित्त विभागाच्या व्यय-१३, अर्थोपाय शाखेच्या सहमतीने त्यांचा अनौपचारीक संदर्भ क्र. ९०/अर्थ-१९, दि.३०/०६/२०१५ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८१७१८३०५४४२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayshree Suresh Jadhav

Digitally signed by Jayshree Suresh Jadhav
DN: CN = Jayshree Suresh Jadhav, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.08.19 15:42:01 +05'30'

**(ज. सु. जाधव)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, मुंबई.

६. सहसंचालक, आरोग्य सेवा (हि. ह. व ज. रो), पुणे-१/६.
७. प्रशासकीय अधिकारी(आहरण व संवितरण अधिकारी),आरोग्य सेवा संचालनालय,मुंबई
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०.आदिवासी विकास विभाग, (का-८), मंत्रालय, मुंबई
११.वित्त विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१२.वित्त विभाग (व्यय-१३)(व्यय-१४), मंत्रालय, मुंबई.
१३.वित्त विभाग (अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
१४.सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा) मंत्रालय, मुंबई.
१५.सार्वजनिक आरोग्य विभाग (लेखा शाखा) मंत्रालय, मुंबई.
१६.निवड नस्ती (आरोग्य-५).